मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या कामासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सीसीटी ३११६/प्र. क्र. ७७/पोल-३

गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २४ मार्च, २०१७

वाचा :-

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आयएसएस १००९/प्र.क्र.३१३/विशा-४, दि.२७.०७.२०११.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.आयएसएस-१००९/प्र.क्र.३१३ (भाग-२)/विशा-४, दि.६.१.२०१२.
३) महाराष्ट्र शासन आणि मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी यांचे दरम्यान दि.७.२.२०१५ रोजी झालेला करार.
४) शासनाचे क्र.सीसीटी ३११५/प्र.क्र.२१/पोल-३,दि.७.२.२०१५ चे कार्यादेश.
५) गृह विभाग, शासन निर्णय क्र. सीसीटी-३११५/प्र.क्र.१९७/पोल-३, दि.०२.०३.२०१६.
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६
७) मे.लार्सन ॲण्ड टुब्रो लि. या कंपनीने सादर केलेले दि.१०.११.२०१६ चे देयक.
८) सल्लागार मे.पीडब्ल्यूसी कंपनीचा दि.२२.३.२०१७ चा ई-मेल संदेश.
९) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय समितीच्या दि.२०.०३.२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

प्रस्तावना-

मुंबई शहरात सुरक्षेच्या दृष्टीने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनी लि. या कंपनीसोबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासनाने करार केला आहे. सदर करारानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाची एकूण किंमत रु. ९४९ कोटी एवढी ठरविण्यात आली आहे. सदर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी गृह विभाग, शासन निर्णय दि.०६.०१.२०१२ अन्वये एकूण रु.६०० कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच तद्नंतर गृह विभाग, शासन निर्णय दि.०२.३.२०१६ अन्वये रु. ३४९ कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

मुंबई व राज्यात सुरक्षा विषयक उपाययोजना करण्याकरिता आवश्यक ते सर्व निर्णय घेण्यासाठी गृह विभाग, शासन निर्णय दि.२७.०७.२०११ अन्वये मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्च स्तरीय शक्ती प्रदान समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समितीच्या

दि.२०.३.२०१७ रोजीच्या बैठकीमध्ये मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या तिसऱ्या टप्प्यातील केलेल्या कामासाठी प्रकल्प संचालक (SI) मे. लार्सन ॲण्ड टुब्रो लि. या कंपनीला रु.६५ कोटी एवढा निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच प्रकल्प सल्लागार, मे. पीडब्ल्यूसी कंपनीने दिलेल्या अहवालानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या पहिल्या व दुसऱ्या टप्प्यातील जे काम कंपनीने आता पुर्ण केले आहे त्या कामासाठी प्रकल्प संचालक (SI) मे. लार्सन ॲण्ड टुब्रो लि. या कंपनीला रु.३,८४,७७,०२६/- एवढी रक्कम देय आहे. मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या तिसऱ्या टप्प्याच्या कामापोटी प्रकल्प संचालक (SI) मे.लार्सन ॲण्ड टुब्रो लि. या कंपनीने उपरोक्त संदर्भाधिन क्र. ७ येथे नमूद दि.१०.११.२०१६ रोजीच्या पत्रान्वये रु.१३०,४१,९८,४१६/- एवढया रकमेचे देयक शासनास सादर केले आहे. तथापि सदर प्रकल्पाच्या तिसऱ्या टप्प्यातील पूर्ण झालेले काम विचारात घेवून उच्च स्तरीय समितीने उपरोक्त प्रमाणे दिलेली मान्यता व पहिल्या व दुसऱ्या टप्प्यातील आता पुर्ण केलेल्या कामाबाबत प्रकल्प सल्लागार,मे.पीडब्ल्यूसी कंपनीने दिलेला अहवाल विचारात घेवून मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या केलेल्या सदर कामासाठी प्रकल्प संचालक (SI) मे.लार्सन ॲण्ड टुब्रो लि. या कपंनीला एकूण रु.६८,८४,७७,०२६/- एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाबाबत मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय समितीच्या दि.२०.३.२०१७ रोजीच्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार व मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या पहिल्या व दुसऱ्या टप्प्यातील आता पुर्ण केलेल्या कामाबाबत प्रकल्प सल्लागार,मे.पीडब्ल्यूसी कंपनीने दिलेल्या अहवालानुसार प्रकल्प संचालक (SI) मे. लार्सन ॲंड टुब्रो लि. या कंपनीला सदर कामासाठी रु. ६८,८४,७७,०२६/- (अक्षरी रुपये अडुसष्ट कोटी चौऱ्याऐंशी लाख सत्याहत्तर हजार सव्वीस रुपये फक्त ) एवढ्या रकमेची देयके अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कमेची देयके कंपनीला अदा करतांना आयकर व इतर प्रचलीत कर वजाती करुन अदा करण्यात यावी.

३. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च हा "मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२-यंत्रसामग्री साधनसामग्री"या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ नुसार प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम(भाग-२), दि.१७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनु.क्र. ४, नियम क्र.७ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरहु रक्कम आहरीत करण्यासाठी पोलीस आयुक्त, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात येत आहे. त्यांनी उपरोक्त निधी Larsen & Toubro Ltd.-SW&C BU या कंपनीच्या १६३, अन्नासलाई, चेन्नई-६०० ००२ येथील सीटी बँकेच्या शाखेचे खाते क्र.0521466308 (IFSC Code - CITI0000003) (MICR CODE OF THE BANK-600037002) या खात्यावर जमा करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२४१७४६५०७०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a7 08cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2017.03.24 17:47:43 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण ) यांचे खाजगी सचिव.
५. मा.मुख्य सचिव
६. अपर मुख्य सचिव (गृह),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (विशेष),गृह विभाग,मंत्रालय, मुंबई.
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.पोलीस आयुक्त, मुंबई.
११.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१२.महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५. प्रकल्प संचालक मे. लार्सन अँड टुब्रो कं. लि, एल अँड टी हाऊस, एन. एम. मार्ग, बलार्ड इस्टेट, मुंबई-१.
१६. प्रकल्प सल्लागार मे.प्राईसवॉटर हाऊस कुपर्स लि.,२५२,वीर सावरकर मार्ग,दादर (प), मुंबई-४०० ०२८.
१७.वित्त विभाग, कार्यासन व्यय-७/वित्तीय सुधारणा.
१८. अवर सचिव, अर्थसं-१/गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.
१९.रोख शाखा/ गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.
२०.निवडनस्ती, पोल-३.

*****